**पुनर्वसन आस्थापना कोंकण विभाग**
**प्रकल्प विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या कोंकण विभागातील मंजूर अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०१९/प्र.क्र.१०९/र-३,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १६ ऑक्टोंबर, २०१९

**वाचा:-**

१. शासन निर्णय क्रमांक असंक १०-००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ०४.१०.२००४
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:- आरपीए २००८/प्र.क्र.४३२/र-१, दि. २८.०१.२०१०
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:- आरपीए २००८/प्र.क्र.४३२/र-१, दि. २१.०४.२०१०
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:-आरपीए-२०१९/प्र.क्र.३३/र-३, दि. ०५.०३.२०१९
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.२१/०२/२०१९ व दि.११/०९/२०१९.
६. उप आयुक्त, (पुनर्वसन) कोकण विभाग, यांचे पत्र क्र.पुनर्वसन/कार्या-१/मुदतवाढ/२०१९, दि. ३०.०९.२०१९

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ अन्वये पुनर्वसन विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील पदांचा आढावा निश्चित करण्यात आला असून सदर शासन निर्णयानुसार कोंकण विभागातील ३२ पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे.

कोंकण विभागातील प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ३२ अस्थायी पदांना शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.३३/र-३, दि.०५/०३/२०१९ अन्वये दि. ०१/०३/२०१९ ते दि. ३०/०९/२०१९ पर्यंत अंतिम मुदतवाढ मंजूर करण्यात आली होती. तसेच दि. २७/०७/२०१५ च्या शासन निर्णयान्वये नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी पुनर्वसनाचे कामाकरिता ८ पदे निर्माण करण्यात आली आहेत.

कोंकण विभागांतर्गत पुनर्वसनाच्या कामासाठी आकृतीबंधानुसार मंजूर असलेल्या एकूण ३२ + पालघर जिल्ह्यातील ६ अस्थायी + २ बाहय यंत्रणेद्वारे असे ३८+२ (बाहय यंत्रणेव्दारे) अस्थायी पदांना दिनांक ०५/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०/०९/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. आता वित्त विभागाच्या दिनांक ११/०९/२०१९ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक २९/०२/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार सर्व प्रशासकीय विभागांना देण्यात आलेले आहेत. त्यामुळे सदर ३८+२ (बाहय यंत्रणेव्दारे) अस्थायी पदांना दिनांक २९/०२/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, कोंकण विभाग, नवी मुंबई तसेच ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग/पालघर या जिल्हा पुनर्वसन कार्यालयात प्रकल्प विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ३८ + २ बाहय यंत्रणेद्वारे भरण्यात येणाऱ्या पदांना दि.०१/१०/२०१९ ते दिनांक २९/०२/२०२० या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. ही सर्व पदे संबंधित विभागातील संवर्गातील तात्पुरती वाढ समजण्यात यावीत. या पदधारकांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व अन्य भत्ते देय आहेत.

३. विवरणपत्रातील पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू रहाणार नाहीत.

४. या ३८+२ (बाहय यंत्रणेव्दारे) अस्थायी पदांवर सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षात होणा-या खर्चापैकी आयुक्त, कोंकण विभाग, नवी मुंबई यांच्या कार्यालयातील ५ पदांचे वेतन व इतर भत्त्यावरील खर्च हा " मागणी क्रमांक सी-५ मुख्य लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण २०२ (०२)-उत्पादन सुरू करण्याची योजना - (०३) प्रकल्पबाधित व्यक्तींची पुनर्वसन - (०३) (०१) - आयुक्त कोंकण (२२३५ १८७१) (योजनेतर) " या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्याच लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर झालेल्या अनुदानातून खर्च करण्यात यावा. तसेच जिल्हाधिकारी कार्यालयांमधील पुनर्वसन आस्थापनेवरील ३३+२ (बाहय यंत्रणेव्दारे) पदांचे वेतन व इतर भत्त्यांवरील खर्च " मागणी क्रमांक सी-५-२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना - २०२ (०४) उत्पादन सुरू करण्याची योजना - (०४) (०१) प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन - (०४) (०१) - आयुक्त कोंकण - (२२३५१९३३) (योजनांतर्गत) " या लेखाशीर्षाखाली टाकावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदरहू योजनांतर्गत खर्च अंतिमत : कोंकण पाटबंधारे विकास महामंडळाकडे वर्ग करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक:-पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. ११/०९/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०१६१०५२३४०३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Pandurang Gaikwad

Digitally signed by Vasant Pandurang Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, serialNumber=7c71de18a037ce1808bb4e1ba5462d93eb69c5feb96700eda8adf1b3c9c753f8, cn=Vasant Pandurang Gaikwad
Date: 2019.10.16 10:54:27 +05'30'

**( व. पां. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत:**-विवरण पत्र

**प्रत:**

१. आयुक्त,कोंकण विभाग, नवी मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४. जिल्हाधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग/पालघर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग/पालघर
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१०/अर्थसंकल्प-१९) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. कार्यासन अधिकारी ब-१/र-१/र-८ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१०. निवड नस्ती, कार्यासन र-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

## विवरणपत्र

महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०१९/प्र.क्र.१०९/र-३, दि.१६/१०/२०१९ अन्वये मुदतवाढ दिलेल्या कोंकण विभागातील अस्थायी पदांचे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदांचा तपशील | आयुक्त कार्यालय, कोंकण विभाग | जिल्हाधिकारी कार्यालय | | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | ठाणे | पालघर | रायगड | रत्नागिरी | सिंधुदुर्ग | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १) | उपआयुक्त (पुनर्वसन) कोकण विभाग | ०१ | -- | -- | -- | -- | -- | ०१ |
| २) | उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) | -- | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०५ |
| ३) | पुनर्वसन तहसिलदार | -- | -- | -- | ०१ | -- | ०१ | ०२ |
| ४) | उपलेखापाल | ०१ | -- | -- | -- | -- | -- | ०१ |
| ५) | अव्वल कारकून | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०६ |
| ६) | मंडळ अधिकारी | -- | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०५ |
| ७) | लिपीक टंकलेखक | -- | ०१ | ०१ | ०१ | -- | ०१ | ०४ |
| ८) | तलाठी | -- | ०१ | ०१ | -- | -- | ०१ | ०३ |
| ९) | भूमापक (सर्व्हेअर) | -- | ०१ | ०१ | ०१ | -- | ०१ | ०४ |
| १०) | वाहनचालक | ०१ | ०१ | ०१ बाहय यंत्रणेव्दारे | -- | -- | -- | ०२+१ बाहय यंत्रणेद्वारे |
| ११) | शिपाई | ०१ | ०१ | ०१ बाहय यंत्रणेव्दारे | ०१ | ०१ | ०१ | ०५+१ बाहय यंत्रणेद्वारे |
| | एकूण | ०५ | ०८ | ०६+२ बाहय यंत्रणेव्दारे | ०७ | ०४ | ०८ | ३८+२ बाह्य यंत्रणेव्दारे |

********************************************